राज्यातील कृषी व यंत्रमाग ग्राहक यांना वीज दरात सवलत दिल्यामुळे महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना द्यावयाचे अर्थसहाय्य. (समायोजन) सन २०१५-१६ उर्वरित अनुदान (योजनेत्तर)

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र.निधिवि-२०१५/प्र.क्र.६९(१)/ ऊर्जा-३**
**मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय मुंबई ४०००३२**
**दिनांक १३ जुलै, २०१५**

**संदर्भ** :- १. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.विपुअ-२०१२/प्र.क्र.९१/ऊर्जा-३ दिनांक ११ ऑक्टोबर, २०१२

२. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.टॅरिफ-२०१२/प्र.क्र.९१ (भाग-२) /ऊर्जा-३ दिनांक ०५ मार्च, २०१३

३. व्यवस्थापकीय संचालक,महावितरण,व्यस/१०८१५ दिनांक १५/०४/२०१५ चे पत्र

४. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. टॅरिफ २०१५/प्र.क्र.६९/ ऊर्जा-३ दिनांक १३ जूलै २०१५

**प्रस्तावना:-**

शासन निर्णय दि.११/१०/२०१२ च्या शासन निर्णयान्वये राज्य शासनाकडून कृषी ग्राहक व यंत्रमाग ग्राहक यांना वीज दरात सवलत देण्यात येते. कृषीग्राहक व यंत्रमागधारक यांना वीज दरात देण्यात येणा-या सवलतीपोटी शासनाकडून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित (महावितरण) यांना रु.१८९० कोटी इतके अनुदान वितरीत करावयाचे आहे. परंतु विद्यमान वित्तीय वर्षात महावितरण कंपनीकडून विद्युत शुल्क व वीज विक्रीकरापोटी माहे सप्टेंबर २०१४ ते फेब्रुवारी २०१५ या सहामाही कालावधी करीता प्रतिमाह रु.३१५ कोटी प्रमाणे एकूण रु.१८९० कोटी एवढी रक्कम शासनास देय आहे.सदर रक्कम समायोजित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

सन २०१५-१६ या वित्तीय वर्षात रु.४९६२,६९,००,०००/-(रुपये चारहजार नऊशे बासष्ठ कोटी एकोणसत्तर लाख फक्त) अर्थसंकल्पीय तरतूद आहे. आतापर्यंत रु.८८५,८०,००,०००/-(रुपये आठशे पंच्याऐंशी कोटी ऐंशी लाख फक्त) इतकी रक्कम महावितरण कंपनीस वितरीत करण्यात आली आहे. आता रु.१८९०,००,००,०००/- (रुपये एक हजार आठशे नव्वद कोटी फक्त) इतकी रक्कम समायोजनाद्वारे महावितरण कंपनीस वितरीत करण्यासंदर्भात खालील प्रमाणे शासन निर्णय निर्गमीत करण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय</u>** :-

कृषी ग्राहक व यंत्रमाग ग्राहक यांना सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात वीज दरात दिलेल्या सवलतीसाठी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना देय असलेली उर्वरित अनुदानाची रक्कम रु.१८९०,००,००,०००/- (एक हजार आठशे नव्वद कोटी फक्त) समायोजनाने वितरीत करण्यास या निर्णयाद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. वरील बाबींचा खर्च "मागणी क्रमांक के-६, २८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण, ८०० इतर खर्च, (००) (०१) कृषी विषयक व यंत्रमाग विषयक प्रशुल्क कमी करण्यासाठी वीज वितरण / पारेषण अनुज्ञप्तीधारकांना अर्थसहाय्य (योजनेत्तर) (२८०१२६१५) ३३ अर्थसहाय्य" या लेखाशिर्षा खाली खर्ची टाकावा व तो सन २०१५-२०१६ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. समायोजनाद्वारे वितरीत करावयाची रक्कम रु.१८९०,००,००,०००/- (एक हजार आठशे नव्वद कोटी फक्त) महावितरण कंपनीस रोख न देता पुढे दर्शविल्याप्रमाणे महावितरण कंपनी मर्यादित यांचेकडून शासनास येणे असलेल्या रकमेपोटी वसूल करण्यात यावी व खाली नमूद केलेल्या जमा लेखाशिर्षाखाली समायोजनाद्वारे जमा करण्यात यावी.

| अ.क्र. | तपशील | रक्कम रुपये | जमा लेखाशिर्ष |
|---|---|---|---|
| १. | वित्तीय वर्ष सन २०१४-१५ या वर्षातील विद्युत शुल्कापोटी या आदेशान्वये समायोजीत करावयाची उर्वरित रक्कम | रु.१७४०,००,००,०००/- | ००४३, विजेवरील कर व शुल्क, १०१ विजेचा वापर व विक्री यावरील कर, (०१)(०१) मुंबई विद्युत शुल्क अधिनियम १९५८ खालील जमा रकमा (००४३००९२) |
| २. | वित्तीय वर्ष सन २०१४-१५ या वर्षातील विजेच्या विक्रीवरील करापोटी या आदेशान्वये समायोजित करावयाची उर्वरित रक्कम | रु.१५०,००,००,०००/- | ००४३, विजेवरील कर व शुल्क, १०१ विजेचा वापर व विक्री यावरील कर, (०१)(०३) महाराष्ट्र विजेच्या विक्रीवरील कर (००४३००८३)(सुधारणा) अधिनियम २००४ |
| | **एकूण** | **रु.१८९०,००,००,०००/-** | |

४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई यांनी त्याच्या अखत्यारित आणि अधिकारात वरील विवरणपत्रानुसार सदर रक्कम रु.१८९०,००,००,०००/- (एक हजारआठशे नव्वद कोटी फक्त)चे पुस्तकी समायोजन करुन तसे शासनास कळवावे.

५. सदर रकमेचे पुस्तकी समायोजन महालेखापाल मुंबई यांचे अखत्यारित व अधिकारात करण्यात येत असल्याने रु.१८९०,००,००,०००/- (एक हजार आठशे नव्वद कोटी फक्त) चे देयक तयार करण्यात येऊ नये.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.२८६/२०१५ वित्त विभाग व्य-१६, दिनांक ०७/०७/२०१५ अन्वये मिळालेल्या त्या विभागाच्या मान्यतेने निर्गमीत करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१५०७१३१७१०११८५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas M Rajurkar

Digitally signed by Vilas M Rajurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vilas M Rajurkar
Date: 2015.07.13 17:11:47 +05'30'

**(वि.म.राजुरकर)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत:-**

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधार कंपनी मर्यादित, हॉंगकॉंग बँक बिल्डिंग, फोर्ट, मुंबई.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे, (पूर्व), मुंबई-५१
३) सचिव महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर नं.१, १३ वा मजला, कफ परेड, कुलाबा, मुंबई-०५
४) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
५) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
७) अधिदान व लेखा अधिकारी, अराप / रालेवि-१), मुंबई.
८) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
९) निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.
१०) अवर सचिव (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
११) क.अ.अधिकारी (प्रशा-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
१२) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१३ / साधनसंपत्ती / साऊ / व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-३२.
१३) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, सार्वजनिक बांधकाम प्रशासकीय इमारत, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, ३ रा मजला, चेंबुर, (पूर्व), मुंबई-४०००७१.
१४) निवडनस्ती, उर्जा-३.